कोविड-१९ साथरोग प्रादुर्भावाच्या पार्श्वभुमीवर महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेअंतर्गत हमी तत्वावर उपचाराच्या दाव्याची अंगीकृत रूगणलयास प्रतिपूर्ती करण्यासाठी २२१० जी २५१ या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मफुयो -२०२१/प्र.क्र.९७ /आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: ०६ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दि.२६ फेब्रुवारी, २०१९.
२) सा. आ. वि., शासन निर्णय क्रमांक: रास्वयो-२०२०/प्र.क्र.८०/आरोग्य-६, दि. २३ मे, २०२०.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दि. ०६ एप्रिल, २०२१.
४) सा. आ. वि., शासन निर्णय क्रमांक: रास्वयो-२०२०/प्र.क्र.८० (भाग-१)/आरोग्य-६, दि. २६.०८.२०२१.
५) राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्रमांक: राआहसो /लेखा /प्रअ /९४६४/१६३७/२०२१, दिनांक ०८.१०.२०२१.

**प्रस्तावना :-**

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रू. ४९८.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित व पुरवणी मागणीद्वारे २७२.५२ कोटी असा एकूण ७७०.५२ कोटी उपलब्ध करण्यात आलेला आहे. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत हमी तत्वावर उपचाराच्या दाव्याची अंगीकृत रुग्णालयास प्रतीपुर्ती करण्यासाठी रू.४९,०९,८५,०००/- (अक्षरी रूपये एकोनपन्नास कोटी नऊ लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) इतका निधी २२१० जी २५१ (सर्वसाधारण), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत माहे जानेवारी २०२१ पर्यंत अप्राप्त निधी व दि.०१.०२.२०२१ ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीतील हमी तत्वावर उपचाराच्या दाव्याची अंगीकृत रुग्णालयास प्रतीपुर्ती करणे यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत रू.४९,०९,८५,०००/- (अक्षरी रूपये एकोनपन्नास कोटी नऊ लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
(०१) नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
(०६) - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०६) (३४)- महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना(सर्वसाधारण) (राज्य योजना)
२२१० जी २५१ (दत्तमत), ३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

२. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई-०१ हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई-०१ हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. वित्त विभागाच्या दिनांक ०६.०४.२०२१ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौ. सं.क्र.५१२/२०२१ / व्यय-१३, दिनांक २६.११.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०६११५२२०९९१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2021.12.02 10:06:38 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. ( ३ प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
१०. वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती.